## भारताने केली क्षेपणास्त्रविरोधी यंत्रणेची खरेदी

०१. भारत आणि रशियामध्ये अत्याधुनिक हवाई संरक्षण यंत्रणेसाठी करार झाला आहे. या करारा अंतर्गत पाच एस-४०० ट्रायंफ क्षेपणास्त्र विरोधी संरक्षण यंत्रणेसाठी भारत ३९ हजार कोटी रुपये देणार आहे. दिवसा आणि रात्री अशा दोन्ही वेळी या क्षेपणास्त्राचा वापर करता येऊ शकतो.

०२. एस-४०० रशियाची सर्वाधिक आधुनिक हवाई संरक्षण यंत्रणा आहे. ही यंत्रणा सध्या रशियाकडून सीरियामध्ये तैनात करण्यात आली आहे. या यंत्रणेच्या मदतीने ३०० ठिकाणांना ट्रॅक करता येऊ शकते. ४०० किलोमीटर अंतरावर असणारी ३६ लक्ष्ये भेदण्याचे सामर्थ्य या यंत्रणेत आहे.

०३. विशेष म्हणजे एस-४०० मध्ये स्टिल्थ विमानांना ट्रॅक करणारी यंत्रणा आहे. स्टिल्थ विमाने सामान्य रडारवर दिसत नाहीत. मात्र एस-४०० मधील यंत्रणा या विमानांनादेखील ट्रॅक करु शकते.या यंत्रणेमुळे भारताला चीन आणि पाकिस्तानच्या अण्वस्त्रांपासून संरक्षण मिळणार आहे.

०४. भारताने नौदलासाठी फ्रिगेट (विनाशिकांना संरक्षण देणाऱ्या नौका) उभारण्याच्या करारवरदेखील स्वाक्षऱ्या केल्या आहेत. याशिवाय केमोव-२२६ हेलिकॉप्टरची संयुक्त निर्मिती करण्याचा निर्णयदेखील दोन्ही देशाच्या प्रमुखांनी घेतला आहे.

०५. केंद्र सरकारकडून रशियासोबत संरक्षण क्षेत्रासाठी अनेक महत्त्वपूर्ण करार करण्यात आले आहेत. सोव्हिएतकालीन लष्करी उपकरणांमध्ये सुधारणा करण्यासाठी १००० कोटी डॉलरचा करार करण्यात आला आहे.

०६. मागील महिन्यात भारताने फ्रान्ससोबत ३६ राफेल विमान खरेदीचा करार केला आहे. राफेल विमाने भारताला फ्रान्सकडून ठरलेल्या वेळेपेक्षा ३६ महिने आधीच मिळणार आहेत.

## देशाच्या करसंकलनात २६ टक्के वाढ

०१. चालू आर्थिक वर्षाच्या पहिल्या सहामाहीत देशाच्या अप्रत्यक्ष कर संकलनात २६ टक्के तर प्रत्यक्ष कर संकलनात ९ टक्क्यांची वाढ नोंदवण्यात आली आहे. प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष कर संकलन रु. ७.३५ लाख कोटी झाले आहे.

०२. एप्रिल ते सप्टेंबर या सहामाहीमध्ये अप्रत्यक्ष कर संकलन रु. ४.०८ लाख कोटींवर पोचले आहे. प्रत्यक्ष कर

संकलन रु. ३.२७ कोटी झाले आहे. उत्पादन शुल्कात ४६ टक्के वाढ झाल्याने यंदा एकूण अप्रत्यक्ष करांमध्ये लक्षणीय वाढ नोंदवण्यात आली आहे.

०३. एकूण चालू आर्थिक वर्षासाठी सरकारने अप्रत्यक्ष कर संकलनाचे रु. ७.७९ लाख कोटी तर प्रत्यक्ष कर संकलनाचे रु. ८.४७ लाख कोटी ध्येय राखले आहे. केंद्र सरकारने आर्थिक वर्ष २०१६-१७ साठी रु. १६.२६ लाख कोटी एकूण कर संकलनाचे लक्ष्य ठेवले आहे.

## १५ऑक्टोबर रोजी जागतिक 'हॅन्डवॉश' दिन साजरा

०१. अस्वच्छतेमुळे होणाऱ्या रोगांपासून मुक्ती मिळवायची असेल, तर हात साबणाने धुणे आवश्यकच आहे. अनेक आजारांचे मूळ हे अस्वच्छतेत असते.

०२. तसेच या पार्श्वभूमीवर हात धुण्याचे महत्त्व अधोरेखित करणे व त्याच्या जनजागृतीसाठी १५ ऑक्टोबर हा जागतिक हात धुणे दिन म्हणून पाळला जातो.

०३. हातांची स्वच्छता म्हणजे निरोगी आयुष्याच्या वाटचालीतील एक महत्त्वाचा भाग असल्याचे सिद्ध झाले आहे. लहान मुलांना त्याचे महत्त्व समजावून सांगणे ही मोठ्यांची जबाबदारी आहे. जेवणापूर्वी तर स्वच्छ हात धुणे याला पर्यायच नाही.

## रशियासोबत १६ क्षेत्रातील महत्त्वपूर्ण करार

०१. भारत आणि रशियामध्ये १६ करारांवर स्वाक्षऱ्या झाल्या आहेत. उर्जा, नौकाबांधणी, अवकाश संशोधन आणि स्मार्ट सिटीज या क्षेत्रातील सहकार्य करारांवर दोन्ही देशाच्या प्रमुखांनी स्वाक्षऱ्या केल्या आहेत. गोव्यात सुरू असलेल्या ब्रिक्स परिषदेदरम्यान पंतप्रधान नरेंद्र मोदी आणि रशियाचे अध्यक्ष व्लादिमीर पुतीन यांची भेट झाली.



०२. तामिळनाडूतील कुडनकुलममध्ये अणू प्रकल्प उभारला जातो आहे. रशियाच्या सहकार्याने उभारल्या जात असलेल्या या अणू प्रकल्पातील युनिट क्रमांक ४ आणि ५ च्या भूमिपूजनाचा कार्यक्रमदेखील संपन्न झाला.

०३. भविष्याचा विचार करुन विज्ञान आणि तंत्रज्ञान आयोग स्थापन करण्याचा निर्णयदेखील दोन्ही देशांकडून घेण्यात आला आहे.

०४. भारत आणि रशियामध्ये चार नौदल फ्रिगेट्स (विनाशिकांना संरक्षण देणाऱ्या नौका) आणि हवाई संरक्षण प्रणाली खरेदीबद्दलचा करार झाला आहे. याशिवाय २०० कामोव २२६टी हेलिकॉप्टरची संयुक्तपणे उभारणी करण्याचा निर्णयदेखील दोन्ही देशांनी घेतला आहे.

०५. ब्रिक्स परिषदेसाठी भारत, रशिया, चीन, ब्राझील व दक्षिण आफ्रिका या पाच देशांचे राष्ट्रप्रमुख दक्षिण गोव्यातील बाणावली येथे आले आहेत. या परिषदेच्या पार्श्वभूमीवर भारत व रशियामध्ये स्वतंत्रपणे चर्चा झाली. या चर्चेनंतर मोदी व पुतीन यांनी संयुक्तपणे घेतलेल्या पत्रकार परिषदेत भारत- रशियामधील करारांची माहिती दिली.

०६. मेक इन इंडिया संकल्पनेच्या उद्देशपूर्तीसाठी रशिया मदत करणार आहे. वार्षिक संरक्षण औद्योगिक परिषदेसाठीही दोन्ही देशांनी मंजुरी दिली आहे. त्यात दोन्ही देशांतील सर्व संबंधितांना परस्परांशी सहकार्य करण्यास प्रोत्साहित करण्याचा निर्णय चर्चेत घेण्यात आला.

०७. भारतीय कंपन्यांनी रशियात हायड्रोकार्बन, तेल व वायू क्षेत्रात ५.५ अब्ज डॉलरची गुंतवणूक केली आहे. पुतीन यांच्या सहकार्याने रशियातील भारतीय गुंतवणुकीचा विस्तार करण्यात येणार आहे. दोन्ही देशांदरम्यान गॅसवाहिनी

मार्गाचा अभ्यास सुरू करण्यात येणार आहे. नागरी अणुऊर्जा, नैसर्गिक वायू, तेल आदी क्षेत्रातील भागीदारीमुळे दोन्ही देशांदरम्यान ऊर्जापूल स्थापन होणार आहे.

०८. इतर प्रमुख करार -----

----- २२६ कामोव्ह हेलिकॉप्टर्सच्या खरेदीसाठी भागधारक करारावर सह्या

----- रशियन स्पेस कॉर्पोरेशन आणि इस्रोमध्ये सहकार्य करार

----- शिक्षण आणि प्रशिक्षणासाठी सहकार्य

----- भारतीय आणि रशियन रेल्वे विभाग यांच्यात सहकार्य करार

----- वाहतूक सुविधा प्रणाली विकास, आंध्र प्रदेशात स्मार्ट सिटीसाठी सामंजस्य करार

----- रॉसनेफ्ट आणि एस्सार ऑईलमध्ये झालेल्या यशस्वी कराराची घोषणा

----- नौकाबांधणी क्षेत्र विकासासाठी युनायटेड शिप-बिल्डिंग कॉर्पोरेशन

----- आंध्र प्रदेश इकॉनॉमिकल डेव्हलपमेंट बोर्ड यांच्यात करार

----- शहरी विकास आणि स्मार्ट सिटी प्रकल्पांसाठी सामंजस्य करार